**पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमांतर्गत सहकार विभागाची माहिती BISAG-N या GIS पोर्टलवर अपलोड करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.बैठक ०३२५/ प्र.क्र.७१/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५.०४.२०२५

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र. आयडीसी २०२४/ प्र.क्र.१११/ उद्योग-२, दि. १२.०८.२०२४.

२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १०.०२.२०२५रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

३) मा. मुख्य सचिव कार्यालयाचे क्र.८००४२४९/२०२५/मुसका, दि. ०७.०३.२०२५ रोजीचे पत्र.

४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचे पत्र क्र. सववि-३५.२४/प्र.क्र.१८१/आस्था-१, दि. १०.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

पीएम गतिशक्ती हा राष्ट्रीय उपक्रम केंद्र शासनाने दि.१३.१०.२०२१ रोजी जाहीर केला आहे. सदर उपक्रम कार्यान्वित करण्यासाठी संस्थात्मक फ्रेमवर्क आणि GIS डेटा आधारीत डिजिटल प्लॅटफॉर्म या दोन प्रमुख घटकांचा समावेश करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या विविध मंत्रालयांकडून पायाभूत सुविधा कनेक्टिव्हिटी प्रकल्पांचे नियोजन आणि अंमलबजावणीद्वारे मल्टी-मॉडल कनेक्टिव्हिटीसाठी प्रकल्पांना एकत्रित करण्याच्या उद्देशाने सुरु केलेला पीएम गती शक्ती हा राष्ट्रीय उपक्रम आहे.

सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रत्येक राज्याने राज्य स्तरावरील माहिती (Data) एकत्रित करुन State Master Plan तयार करुन सदर प्लॅन BISAG-N (Bhaskaracharya National Institute for Space Application & Geo-informatics) या GIS पोर्टल वर भरण्याबाबतच्या सूचना विशेष सचिव (लॉजिस्टीक्स), वाणिज्य व उद्योग मंत्रालय, भारत सरकार यांच्या दि. २१.१२.२०२१ च्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०८.२०२४ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या उपक्रमाच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १०.०२.२०२५ रोजीच्या आढावा बैठकीत दिलेल्या निर्देशांनुसार सर्व विभागांनी त्यांची माहिती पीएम गतीशक्ती पोर्टलवर अपलोड करावयाची आहे. तसेच त्या त्या विभांगानी नोडल ऑफीसरची नियुक्ती करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

पीएम गतिशक्ती पोर्टलवर पायाभूत सुविधांची आणि पायाभूत सुविधांसाठी शासकीय जमिनीचे तसेच नवीन प्रकल्पांसाठी लागणाऱ्या अत्यावश्यक सुविधांचे भू-टॅगिंग प्रदान करण्याच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०५.०३.२०२५ रोजी मंत्रालय येथे आयोजित बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव कार्यालयाच्या संदर्भाधीन दि. ०७.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सूचना दिलेल्या आहेत,

मा. मुख्य सचिव कार्यालयाच्या सूचनांच्या अनुषंगाने सहकार व पणन विभागाच्या संदर्भाधिन दि. १०.०३.२०२५ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सर्व उपविभागांचे सह सचिव/उप सचिव यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले असून सह सचिव व अपर निबंधक यांची सहकार विभागाचे "नोडल अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच सहकार विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या कार्यालयांचे कार्यालय प्रमुख यांची "राज्यस्तरीय नोडल अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

पीएम गतिशक्ती या राष्ट्रीय उपक्रमांतर्गत राज्य स्तरावरील विभागाच्या अधिनस्त कार्यालयांची MRSAC या संस्थेकडून डिजिटल स्वरुपातील माहिती तयार करुन MRSAC या संस्थेमार्फत BISAG-N या GIS पोर्टलवर भरण्यासाठी सहकार विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या खालील कार्यालयांचे कार्यालय प्रमुख यांची "राज्यस्तरीय नोडल अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | कार्यालयाचे नाव |
|---|---|---|
| १. | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ | महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे. |

२. उपरोक्त "राज्यस्तरीय नोडल अधिकारी" यांनी त्यांच्या कार्यालयांतर्गत येणाऱ्या प्रादेशिक विभागीय स्तरावरील अधिकारी आणि जिल्हास्तरीय अधिकारी यांना अनुक्रमे "विभागीय स्तरावरील नोडल अधिकारी" व "जिल्हास्तरीय नोडल अधिकारी" म्हणून नियुक्तीबाबतचे आदेश निर्गमित करावेत.

३. राज्यस्तरीय नोडल अधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयांतर्गत येणाऱ्या योजना/प्रकल्प यांची डिजिटल स्वरुपातील माहिती MRSAC या संस्थेकडून तयार करुन MRSAC या संस्थेमार्फत BISAG-N या GIS पोर्टलवर भरण्याकरीता पोर्टलवर लॉगइन करण्यासाठी संबंधित

अधिकारी/कर्मचारी यांना प्राधिकृत करुन लॉगइन करण्यासाठी खालीलप्रमाणे माहिती pmgatishakti@midcindia.org या ईमेल वर पाठवून संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे लॉगइन आयडी व पासवर्ड प्राप्त करुन घ्यावेत.

| अ.क्र. | तपशील |
|---|---|
| १. | नाव |
| २. | पदनाम |
| ३. | कार्यालयीन ई-मेल (NIC ई-मेल) |
| ४. | मोबाईल |

४. "विभागीय स्तरावरील नोडल अधिकारी" व "जिल्हास्तरीय नोडल अधिकारी" यांनी BISAG-N या GIS पोर्टलचा लॉगइन आयडी व पासवर्ड प्राप्त असलेल्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेमार्फत त्या-त्या कार्यालयांची डिजिटल स्वरुपात माहिती MRSAC या संस्थेकडून तयार करुन योग्य त्या फॉरमॅटमध्ये BISAG-N या GIS पोर्टलवर अपलोड करण्याबाबतची पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. पीएम गतिशक्ती या राष्ट्रीय उपक्रमांतर्गत विभागाची माहिती BISAG-N या GIS पोर्टलवर भरणे व अद्ययावत करणे याबाबत मंत्रालयीन विभाग स्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येईल.

६. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२५१६२९२८४१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.04.25 16:30:21 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव**

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणे.
३. उप सचिव (आस्था), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. कक्ष अधिकारी (२-स/७-स/१३-स/१५/स)
५. निवड नस्ती-१८-स.